**प्रधानमंत्री फसल बीमा योजने अंतर्गत पुनर्रचित हवामान आधारीत पीक विमा योजना राज्यात सन २०१७-१८ मध्ये मृग बहारामध्ये लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन शुध्दिपत्रक क्रमांकः विमायो-१०१७/ प्र.क्र. ३२/१४-अे**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तारभवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १२ जून, २०१७.

<u>वाचा :-</u>

१) शासन निर्णय क्रमांकः विमायो-१०१७/ प्र.क्र. ३२/१४-अे, दिनांक १ जून, २०१७.
२) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र. फलो-१ /मृग २०१७/ १३६१ /१७ दि. २९/०५/२०१७.
३) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/फलो-१ /हआफपिवियो/१४४६/२०१७ दि. १२.०६.२०१७.
४) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/फलो-१ /हआफपिवियो/१४४७/२०१७ दि. १२.०६.२०१७.
५) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/फलो-१ /हआफपिवियो/१४४८/२०१७ दि. १२.०६.२०१७.

<u>शासन शुध्दिपत्रक:-</u>

प्रधानमंत्री फसल बीमा योजना अंतर्गत पुनर्रचित हवामानावर आधारीत पीक विमा योजना २०१७-१८ मृग बहारामध्ये संत्रा, मोसंबी, डाळींब, पेरु व चिकू या ५ फळपिकांकरिता लागू करण्यास संदर्भांकित दिनांक १ जून, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयातील अनुक्रमांक-१२ येथील परिच्छेदानंतर खालील १३, १४ व १५ हे नवीन परिच्छेद समाविष्ट करण्यात येत असून संदर्भाधीन शासन निर्णयातील परिच्छेद-"**१३**" ला परिच्छेद-"**१६**" असे वाचावे:-

**१३.** पुनर्रचित हवामान आधारीत पीक विमा योजनेअंतर्गत अर्ज भरण्यासाठी बँकामध्ये होणारी गर्दी टाळता यावी व शेतक-यांना सुलभपणे अर्ज भरता यावे म्हणून या मृग बहारापासुन गांवपातळीवर बिगर कर्जदार शेतक-यांसाठी बँकेव्यतिरिक्त Common Service Centre (CSC) उपलब्ध करुन देण्यात येणार आहेत. सदर CSC सर्व गावांमध्ये सुरू होईपर्यंत, बिगर कर्जदार शेतक-यांनी विम्या हप्त्याची रक्कम पुर्वीप्रमाणेच नजीकच्या बँक शाखेमध्ये भरावी. बिगर कर्जदारांच्या सोयीकरिता राज्यात सी.एस.सी. ई-गव्हर्नस सर्व्हिसेस इंडिया लिमिटेडद्वारे कार्यान्वीत "आपले सरकार सेवा केंद्र" (डिजीटल सेवा केंद्र) सुविधा शेतकऱ्यांना पुनर्रचित हवामानावर आधारीत पीक विमा योजनेचे अर्ज भरण्याकरीता उपलब्ध करण्यात येत आहे. राज्यात कार्यान्वीत आपले सरकार सेवा केंद्रापैकी भारतीय विमा नियामक व विकास प्राधिकरणाने प्राधिकृत केलेले सेवा केंद्र, कृषि विभागाने नियुक्त केलेल्या विमा कंपनीच्या वतीने शेतकऱ्यांचे फळ पिक विमा अर्ज भरण्यास मदत करतील व विमा हप्ता स्विकारतील. या करिता प्राधिकृत आपले सरकार सेवा केंद्राचे चालक विमा योजनेचे अर्ज ऑनलाईन पध्दतीने भरतील. फळ पीक विमा अर्जा करिता आवश्यक कागदपत्रे जसे की, ७/१२ उतारा, आधार कार्ड, बँकखात्याचे तपशिल इत्यादी अर्जास ऑनलाईन पध्दतीने जोडतील. शेतकऱ्यांना विमा अर्जाची प्रत, पोहोच उपलब्ध करुन देतील. त्यादृष्टिने संबंधित विमा कंपन्यांनी CSC मार्फत करार करणे बंधनकारक आहे. यासंदर्भात कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचेस्तरावरुन प्राप्त होणाऱ्या सूचना CSC व विमा कंपनीस बंधनकारक राहतील.

**१४.** राज्य शासनामार्फत राज्यात प्रत्येक महसुल मंडळस्तरावर स्वयंचलित हवामान केंद्र उभारण्यासाठी महावेध प्रकल्प राबविण्यात येत आहे. या प्रकल्पांतर्गत स्वयंचलित हवामान केंद्रांची स्थापना झालेली असेल त्या अशा महसूल मंडळामध्ये हवामानाची आकडेवारी उपलब्ध होणार आहे. सबब, पुनर्रचित हवामान आधारीत पीक विमा योजनेंतर्गत लागणारी हवामान विषयक माहिती महावेध प्रकल्पाच्या अटी व शर्तीनुसार स्कायमेट वेदर सर्व्हिसेस लि. या एजन्सीकडून घेणे विमा कंपनीला बंधनकारक राहील तथापि, ज्या महसूल मंडळात महावेध प्रकल्पामार्फत स्वयंचलित हवामान केंद्राची उभारणी अपूर्ण अवस्थेत असेल अशा महसूल मंडळात पूर्वीप्रमाणेच त्रयस्थ यंत्रणेकडून हवामानाची आकडेवारी संबंधित विमा कंपनीला उपलब्ध करून घेता येईल. त्याचप्रमाणे, ज्या महसूल मंडळात त्रयस्थ यंत्रणेमार्फत सुद्धा हवामान विषयक आकडेवारी उपलब्ध होऊ शकली नाही तर सहपत्र ४ मधील मुद्दा क्रमांक ७ व ८ नुसार विमा कंपन्यांनी तात्काळ कार्यवाही करावी.

**१५.** "आधार" ओळखपत्राच्या वापरातुन शासनामार्फत देण्यात येणाऱ्या सेवा, सुविधा, लाभ व अनुदेय वितरण लाभार्थ्यांना करण्याच्या प्रक्रियेत सुलभता, पारदर्शकता, उत्तरदायित्व आणून योजनेचा लाभ थेट शेतकऱ्यांना देण्याकरिता, केंद्र शासनाच्या दिनांक ०८ फेब्रुवारी, २०१७ चे राजपत्रान्वये मृग बहार २०१७ पासून सदर योजनेअंतर्गत सहभागी होणाऱ्या सर्व कर्जदार व बिगर कर्जदार शेतकऱ्यांना आधार कार्ड प्रमाणिकरण करणे अनिवार्य केले आहे.

मृग बहार २०१७ पासून योजनेत सहभाग घेणेसाठी विमा प्रस्ताव तयार करतेवेळी सर्व शेतकऱ्यांनी आपले फोटो असलेल्या बँक खातेपुस्तकाची प्रत तसेच आधारकार्ड यांची छायांकित प्रत सादर करणे आवश्यक आहे. आधार कार्ड उपलब्ध नसल्यास आधारकार्ड नोंदणी पावतीसोबत खालीलपैकी कोणतेही एक फोटो ओळखपत्र सादर करणे आवश्यक आहे. सदर कागदपत्राची तपासणी संबंधीत बँकेमार्फत करावयाची आहे.

१. मतदान ओळखपत्र किंवा

२. किसान क्रेडिटकार्ड किंवा

३. नरेगा जॉबकार्ड किंवा

४. वाहनचालक परवाना.

मृग बहार २०१७ मध्ये पुनर्रचित हवामानावर आधारीत पीक विमा योजनेमध्ये सहभागी होणेसाठी कर्जदार शेतकऱ्यांनी आपल्या बँकेच्या कर्जखात्याशी आधार क्रमांक जोडण्यासाठी बँकेशी त्वरीत संपर्क करावा. त्याचप्रमाणे, बिगर कर्जदार शेतकऱ्यांना फळ पीक विमा योजनेमध्ये सहभागी होण्याकरिता आधार क्रमांकाशी जोडले गेलेले बँक खाते क्रमांकच अर्जावर नमुद करावे लागणार आहेत. यासंदर्भात ज्या शेतकऱ्यांकडे अद्यापिही आधार कार्ड नाही अशा शेतकऱ्यांनी त्वरीत नजीकचे आधार नोंदणी केंद्राशी संपर्क करुन नोंदणीची प्रक्रिया पुर्ण करावयाची आहे.

फळ पीक विमा योजनेकरिता आधार कार्ड जोडलेल्या बँक खात्याच्या वापरामुळे योजनेची अंमलबजावणी सुलभ व जलद होऊन शेतकऱ्यांना चांगली सेवा देणे शक्य होणार आहे. तसेच पीक विम्याची नुकसान भरपाई विमा कंपनीकडून शेतकऱ्यांच्या खात्यावर थेट वर्ग करणे भविष्यात सुलभ होणार आहे. आधार क्रमांक, मोबाईल क्रमांक आदि बँक खात्याशी जोडण्यामुळे बँक खात्याशी संलग्न सेवा सुविधा शेतकऱ्यांना वेळेत उपलब्ध होणार आहेत.

२. वरील वाचा-१ येथील शासन निर्णयातील सहपत्र-१ मध्ये **डाळिंब** या फळ पिकाकरिता **सांगली जिल्ह्यातील** खालील महसूल मंडळांचा समावेश करण्यात यावा:-

| अ.क्र. | तालुका | महसूल मंडळ |
|---|---|---|
| १ | मिरज | कवलापूर, मालगाव |
| २ | तासगाव | तासगाव, मणेराजुरी, विसापूर |
| ३ | खानापूर | विटा, भाळवणी, खानापूर |
| ४ | जत | डफळापूर |
| ५ | कडेगाव | नेवरी, वांगी |
| ६ | पलूस | पलूस |

३. वरील वाचा-१ येथील शासन निर्णयातील सहपत्र-१ मध्ये **खालील** फळ पिकाकरिता **बुलडाणा या जिल्ह्यातील** खालील महसूल मंडळांचा समावेश करण्यात यावा:-

| अ.क्र. | पिक | तालुका | महसूल मंडळ |
|---|---|---|---|
| १ | संत्रा | जळगाव ज. | जामोद |
| | | मेहकर | डोणगाव, हिवराआश्रम, जानेफळ, शेलगाव दे. |
| | | देऊळगावराजा | आंढेरा |
| २ | पेरु | नांदुरा | चांदुर बिस्वा |
| | | जळगाव ज. | पिंपळगाव काळे |
| ३ | डाळींब | चिखली | अमडापूर, शेळगाव आटोळ |
| | | देऊळगावराजा | मेहुणाराजा, आंढेरा |

४. वरील वाचा-१ येथील शासन निर्णयातील सहपत्र-१ मध्ये **डाळिंब** या फळ पिकाकरिता **अहमदनगर या जिल्ह्यातील** खालील महसूल मंडळांचा समावेश करण्यात यावा:-

| अ.क्र. | तालुका | महसूल मंडळ |
|---|---|---|
| १ | शेवगाव | बोधेगाव, चापडगाव. |

५. वरील वाचा-१ येथील शासन निर्णयातील सहपत्र-१ मध्ये **संत्रा** या फळ पिकाकरिता **अमरावती या जिल्ह्यातील** तालुका रकान्यातील **"तेल्हारा"** व महसुल मंडळ रकान्यातील **"हिवरखेड"** वगळण्यात यावेत व त्याचा समावेश **संत्रा पिकाकरिता अकोला या जिल्ह्यातील** तालुका रकान्यातील "**तेल्हारा**" व महसुल मंडळ रकान्यातील "**हिवरखेड**" असा करण्यात यावा.

६. वरील वाचा-१ येथील शासन निर्णयातील सहपत्र-२ मध्ये **डाळिंब** या फळ पिकाचे हवामान धोके व प्रमाणकेच्या शेवटी **"टिपः-सोमवार ते रविवार असा आठवडा निर्धारित करण्यात आला आहे."** अशी तळटीप अंतर्भुत करण्यात यावी.

७. वरील वाचा-१ येथील शासन निर्णयाच्या सहपत्र-३ च्या क्लस्टर २ व ३ मध्ये खालील प्रमाणे सुधारणा करण्यात यावी:-

| अ.क्र. | जिल्हा | पिकाचे नांव | फळपिका खालील क्षेत्र (हे.) | विमा कंपनीचे नाव | विमा संरक्षीत रक्कम | विमा कंपनीने दिलेला विमा दर% | विमा दरात शेतकरी हिस्सा ५% | विमा दरात केंद्राचा हिस्सा | विमा दरात राज्याचा हिस्सा | एकुण विमा हप्ता |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **क्लस्टर - २** | | | | | | | | | | |
| ४ | नाशिक | डाळिंब | १२,१३१.७५ | इफको टोकियो | ११०,००० | ५१.९० | ५,५०० | २५,७९५ | २५,७९५ | ५७,०९० |
| **क्लस्टर - ३** | | | | | | | | | | |
| ६ | अमरावती | मोसंबी | ५३०.०० | एचडीएफसी | ७०,००० | २७.९१ | ३,५०० | ८,०१८.५० | ८०१८.५० | १९,५३७ |

८. शासन निर्णयातील सहपत्र ४ मधील मुद्दा क्रमांक ११ मधील ४ डिसेंबर, १९९९ च्या शासन निर्णयान्वये जिल्हास्तरीय समिती प्रत्येक हंगामाच्यावेळी कृषि विभागामार्फत राज्यातील कृषि विषयक परिस्थितीचे सूक्ष्म निरीक्षण व संनियंत्रण करेल. यासाठी जिल्हास्तरावर जिल्हाधिका-याच्या अध्यक्षतेखाली एक जिल्हास्तरीय समन्वय समिती असेल. सदर समीतीची रचना पुढीलप्रमाणे असेल.

| | | |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २ | सरव्यवस्थापक जिल्हा मध्यवर्ती बँक | सदस्य |
| ३ | व्यवस्थापक, अग्रणी बँक | सदस्य |
| ४ | कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| ५ | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | सदस्य सचिव |

योजनेच्या यशस्वी अंमलबजावणीची जबाबदारी सदर समितीवर राहील.

९. शासन निर्णयातील सहपत्र ४ मधील परिच्छेद क्रमांक ६ व १७ वगळण्यात येत आहेत.

१०. सदर शासन शुध्दिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०६१७१२४५४११७०१ असा आहे. हे शुध्दिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kamlakar Yeshvant Vanjare

Digitally signed by Kamlakar Yeshvant Vanjare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=AGRICULTURE AND ADF DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c08eef62183520696d2005b153b8cc2a552337a23fc4d457a4434216d9324c3b, serialNumber=6fd0ddfb9412fda09432e5f8a3e140c065770ba4ca63ef6fc5ba354810e2828b, cn=Kamlakar Yeshvant Vanjare
Date: 2017.06.17 12:43:50 +05'30'

(क. य. वंजारे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

२. मा.मंत्री ( कृषी व फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव,

३. मा.राज्यमंत्री (कृषी व फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव,

४. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक,

५. प्रधान सचिव ( कृषी ) यांचे स्वीय सहाय्यक,

६. अपर मुख्य सचिव ( वित्त ), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,

७. अपर मुख्य सचिव ( नियोजन ), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,

८. अपर मुख्य सचिव ( महसूल व वन ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,

९. अपर मुख्य सचिव ( सहकार ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,

१०. सचिव, कृषी मंत्रालय, भारत सरकार ( कृषी व सहकार विभाग ) कृषी भवन, नवी दिल्ली (पत्राने),

११. सचिव, वित्त मंत्रालय, भारत सरकार ( वित्त विभाग ) (विमा) नवी दिल्ली ( पत्राने ),

१२. संचालक, पीक विमा भारत सरकार, कृषी मंत्रालय, कृषी व सहकार विभाग, नवी दिल्ली,

१३. आयुक्त कृषी, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,

१४. क्षेत्रीय व्यवस्थापक, ईफको टोकियो जनरल ईन्शुरन्स कंपनी लिमिटेड. ३०३, स्टेलर एन्क्लेव्ह, औंध, पुणे, महाराष्ट्र ४११ ००७,

१५. क्षेत्रीय व्यवस्थापक, रिलायन्स जनरल इन्शुरन्स कंपनी, ५७० रेक्टी फायर हाऊस, वडाळा वेस्ट, मुंबई-३१,

१६. क्षेत्रीय व्यवस्थापक, एच.डी.एफ.सी. ईर्गो जनरल इन्शुरन्स कंपनी लिमिटेड, १ ला मजला, एचडीएफसी हाऊस, एच.टी. पारेख मार्ग, १६५-१६६ बॅकबे रिक्लेमेशन, चर्चगेट, मुंबई-२०.

१७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,

१८. सर्व विभागीय आयुक्त,

१९. अधिदान व लेखा अधिकारी, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई-३२,

२०. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,

२१. महाव्यवस्थापक, महाराष्ट्र नागरी बॅक, ९, नगीनदास रोड, मुंबई-२३,

२२. महाव्यवस्थापक, नाबार्ड, पुनम चेंबर , शिवसागर इस्टेट, वरळी, मुंबई,

२३. महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता)- १ व २, मुंबई /नागपूर ,

२४. विमा संचालक, म्हाडा इमारत, पहिला मजला, बांद्रा पूर्व, मुंबई,

२५. संचालक, माहिती आणि प्रसिध्दी (प्रसिध्दीसाठी ) मंत्रालय, मुंबई,

२६. संचालक, फलोत्पादन, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-०५,

२७. संचालक, फलोत्पादन मृद संधारण, नियोजन, विस्तार व प्रशिक्षण, साखर संचालक, मुख्य सांख्यिक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे ०५,

२८. सर्व जिल्हाधिकारी,

२९. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,

३०. सर्व व्यवस्थापक, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक,

३१. सर्व विभागीय कृषी सह संचालक, महाराष्ट्र राज्य,

३२. उप महाव्यवस्थापक, नाबार्ड, पुनम चेंबर, ५४ वेलस्ली रोड, शिवाजीनगर, पुणे-५,

३३. सरव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी बॅक , ९ नगीनदास रोड, मुंबई- २३,

३४. मुख्य अधिकारी, सेंट्रल फायनान्स एजन्सी, महाराष्ट्र राज्य सहकारी बॅक, ९ नगीनदास रोड, मुंबई-२३.

३५. मुख्य अधिकारी, ग्रामीण नियोजन व पत विभाग, रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया, फोर्ट, मुंबई,

३६. व्यवस्थापक, महाराष्ट्र बँक १५०१, शिवाजीनगर, पुणे-५,
३७. सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी,
३८. सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद,
३९. सर्व सहसचिव /उप सचिव /अवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषी व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई-३२,
४०. उप सचिव, नियोजन विभाग (कार्या.१४३१)/ वित्त विभाग (व्यय-१),
४१. उप सचिव (अर्थसंकल्प), उपसचिव (११ अे), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय मुंबई-३२,
४२. निवडनस्ती -१४ अे.